श्री रत्न जैन ग्रंथमाला नं. ४

॥ श्री पंचपरमेष्ठिभ्योनमः ॥

श्री गुण विजयजी आचार्य कृत

# श्रीवैराग्यशतक

अनुवादक

मुनि श्री आनंद ऋषिजी महाराज

---

श्रीयुत रतनचंदजी छगनमलजी गुणोत
मु. उमरावती यांच्या आश्रयानें

प्रकाशक

श्री जैन धर्म प्रसारक संस्था
सदर बाजार नागपूर.

| प्रथमावृत्ति २५०० | वीरसंवत २४५४ सन १९२८ | मूल्य प्रति ≈।।। शेकडा ३।। |
|---|---|---|

विक्रीचे पैसे पुस्तक प्रकाशित करण्यांत लागतात.

# धन्यवाद.

— —

मुक्काम उमरावती येथील श्रीयुत रतनचंदजी छगनमलजी मुणोत यांनी आर्थिक सहायता देऊन या पुस्तकास प्रकाशित करून दिले, ह्मणून त्या धर्म प्रेमी आणि ज्ञानप्रचारक सज्जनाचाही संस्था अंत:करणपूर्वक ~~धन्यवाद~~ देत असतां आभार मानीत आहे.

मंत्री

# प्रस्तावना.

प्रिय बांधवांनो ! आपल्या सेवेंत "श्री जैन धर्म प्रसारक संस्थेचें" श्री वैराग्यशतक नामक चौथें ट्रॅक्ट देत असतां आम्हांस आनंद वाटतो श्री गुणविजयजी आचार्यांनीं या ग्रंथास मागधी भाषेंत लिहिलें होतें, तें काव्य विशेष प्रासादिक आणि बोधपर असल्यामुळें या पुस्तकाचें जैन धर्म धुरंधर सुप्रसिद्ध लेखक श्रीयुत वाडीलालजी शाह यांनीं गुजराथी भाषेंत अनुवाद करून प्रकाशित केलें आणि त्यावरून ब्यावर येथील श्री जैन पुस्तक प्रकाशक कार्यालयांनीं या पुस्तकास हिंदी भाषेंत भाषांतर करवून छापिलें, या पुस्तकाचा इतक्या भाषेंत प्रकाशित होणेंच सूचित करीत आहे कीं जैन समाजांत हें पुस्तक किती मान्य आहे.

मुनिश्री आनंद ऋषिजी महाराजांनीं या पुस्तकापासून महाराष्ट्रीय लोकांनाहीं लाभ मिळावा या हेतूनें मराठी भाषेंत भाषांतर करून दिलें ह्मणून त्यांचा, त्याच प्रमाणें श्री जैन पुस्तक प्रकाशक कार्यालयाचे ऑनररी

मॅनेजर श्रीमान मोतीलालजी रांका यांच्या कडून मराठी भाषेंत पुस्तक प्रसिद्ध करण्याविषयीं परवानगी मिळाली म्हणून त्या कार्यालयाचा ; आणि नागपूरचे श्री माणिकराव बाळाजी आगरकर जैन मास्तर यांनीं या पुस्तकास तपासण्याकरितां जी अमूल्य वेळ दिली म्हणून त्यांचा श्री जैन धर्म प्रसारक संस्था धन्यवाद पूर्वक आभार मानीत आहे.

मंत्री

श्री महावीराय नमः

## श्री गुण विजयजी आचार्य कृत

# ❀ वैराग्य शतक. ❀

१ क्लेश आणि व्याधीमुळें व्याप्त झालेल्या ह्या संसारांत कोठेंच सुख नाहीं, असें माहीत असतां-नाही हा प्राणी जिनेश्वरांनीं सांगितलेल्या धर्मास धारण करीत नाहीं.

❀ ❀ ❀

२ आज, उद्यां, पुढल्या वर्षी, अशाच प्रकारें तिसऱ्या वर्षी, लक्ष्मीची प्राप्ति होईल, अशा आशेनें मूर्ख लोक फुकटच दिवस घालवितात; परंतु ओंजळींत भरलेल्या पाण्याप्रमाणें आयुष्य गळून राहिलें आहे, असें ते अज्ञानी लोक दृष्टि देऊन पहात नाहींत.

❀ ❀ ❀

३ हे प्राण्यांनो ! जर धार्मिक कार्य उद्यां करावयाचें असेल, तर तें आजच लौकर करून घ्या; कां कीं येणारा उद्याचा दिवस फारच विघ्नकारक आहे; या करितां दुसऱ्या प्रहराची देखील वाट पाहूं नये. अर्थात् जें धर्म कार्य प्रथम प्रहरांत करावयाचें आहे, त्यास दुपारीं करीन असें निश्चित ठरवून विलंब करूं नये.

❀ ❀ ❀

४ प्रेमांत फसलेले स्नेही किंवा संबंधी पुरुष जे प्रातःकाळीं दृष्टिगत झाले होते, तेच पुन्हां संध्याकाळीं दृष्टीस येत नाहींत; अशा संसाराच्या व्यवहारास पाहून मला फारच खेद वाटतो.

❀ ❀ ❀

५ हे मानवांनो ! जागृत ठिकाणीं निजूं नका, अर्थात धर्मकार्यामध्यें आळस करूं नका, आणि अनित्य स्थानीं विश्रांती घेऊं नका, अर्थात् क्षण-भंगुर संसारांत सुख समजून आनंदानें बसून राहूं

नका; कां कीं रोग, म्हातारपण, आणि मरण हे तिन्हीं तुमच्या पाठीमागें लागलेले आहेत.

❀ ❀ ❀

६ चंद्र आणि सूर्यरूपी बैल, रात्रदिवसरूपी घागरींत जीवाचें आयुष्यरूप पाण्यास ग्रहण करून कालरहाटास वरून खालीं आणि खालून वर फिरवीत असतात.

❀ ❀ ❀

७ ज्या शरीरास काळरूपी सर्प खाऊन राहिलेला आहे, त्यापासून मुक्त करून देह (धारण) राहूं शकेल, अशी कोणताच कला नाहीं, औषधि नाहीं, एवम् अशी कोणती देवांत युक्ति नाहीं. ( नाश होणाऱ्या शरीराचें रक्षण करणारा जगांत कोणताच पदार्थ नाहीं.)

❀ ❀ ❀

८ भयंकर शेष नागा सारखी ज्याची नळी आहे, पर्वताप्रमाणे ज्याच्यांत पराग ( सुगंधी ) आहे, आणि दिशेच्या स्वरूपा सारखीं ज्याचीं

पानें आहेत, अशा पृथ्वीरूपी कमळांतून काळ-रूपी भ्रमर मनुष्य रसाचें पान करीत आहे, ही फारच खेदकारक गोष्ट आहे.

❀ ❀ ❀

९. हे भव्य जीवांनो ! सर्व जीवांच्या छिद्रांचा शोध करीत असतां काळ, शरीराच्या छाये प्रमाणें कोणत्याही रीतीनें मनुष्याचा पदर सोडीत नाहीं, म्हणून धर्म कार्यांत दत्तचित्त रहा.

❀ ❀ ❀

१० ह्या अनादि काळाच्या प्रवाहांत परिभ्रमण करीत असतां आणि अनेक प्रकारच्या कर्मापासून परतंत्र झालेला जीव सर्वयोनींत जाऊन भटकत आला आहे. ( ज्या योनींत ह्या जीवानें जन्म घेतला नसेल, अशी कोणतीच योनि नाहीं.)

❀ ❀ ❀

११ हे जीवा ! भाऊ, आई, बाप, मुलगा, आणि स्त्री हे सगळे जण मेलेल्या जीवास ओंजळ

भर पाणी देऊन स्मशान भूमीपासून पुन्हां घरीं फिरून येतात परंतु या नातलगांतून एक देखील मेलेल्या आत्म्याबरोबर जात नाहीं.

❀ ❀ ❀

१२ हे प्राण्या? मुलें आणि मुलींचा, बांधवांचा, आणि प्राणप्रिय असलेल्या स्त्रियांचा वियोग अवश्य होतो, परंतु फक्त एक जिनेश्वरांनीं सांगितलेल्या धर्माचा केव्हांही वियोग होत नाहीं. ( खरा संबंधी तर धर्मच आहे, याकरितां नेहमीं धर्म करणें चांगलें आहे. )

❀ ❀ ❀

१३ हे आत्मन्? आठ कर्मरूपी साखळीनें जकड-लेला जीव संसाररूपी कैदखान्यांत राहतो, परंतु ह्याच आठ कर्मांपासून मुक्त झालेला जीव मोक्षांत राहातो.

❀ ❀ ❀

१४ वैभव, खऱ्या स्नेह्यांचा संबंध, आणि भोगविलासमय मनोहर ऐश आराम हे सगळे

कमळाच्या पानाच्या किनाऱ्यावर पडलेल्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें चंचल आहेत.

❀ ❀ ❀

१५ हे मानवांनो ? तें मागल्या काळांतील सामर्थ्य कोठें गेलें ! ती प्रौढता कोणीकडे उडून गेली ? ती शरीराची सुंदरता कोठें अदृश्य होऊन गेली ? हे सर्व अनित्य आहेत. काळानें अनुकूलतेस भ्रष्ट करून प्रतिकूलता दाखविली आणि शरीर असें बनवून दिलें कीं ह्या गोष्टी कांहींच नव्हत्या; ह्याकरितां वर सांगितलेल्या अनित्यतेपासून सर्व पदार्थांची अनित्यता समजा, आणि पूर्ण रीतीनें मनन करा.

❀ ❀ ❀

१६ निबिड कर्माच्या जाळ्यांत फसलेला मनुष्य संसाररूपी नगराच्या चार गति ( १ नर्क, २ तिर्यंच, ३ मनुष्य, ४ देव ) रूपी चोहाट्यांत नानाप्रकारच्या असह्य वेदना सहन करितो,

परंतु येथें त्याचें रक्षण करणारा आणि शरण देणारा कोणीच नाहीं.

❀ ❀ ❀

१७ हा प्राणी कर्मांच्या कारणानेंच घनघोर, भयंकर, अशुद्ध, अपवित्र, एवं अशुचि, मळमूत्राच्या भंडारानें भरलेल्या गर्भवासांत अनंत वेळीं राहिलेला आहे.

❀ ❀ ❀

१८ ह्या संसारांत जीवाचीं उत्पन्न होण्याचीं ठिकाणें चौऱ्यांशी लक्ष दाखविलीं आहेत, परंतु आपला हा प्राणी एक एका ठिकाणीं अनंत वेळीं उत्पन्न झाला होता.

❀ ❀ ❀

१९ निरनिराळ्या उत्पत्तीच्या ठिकाणीं उत्पन्न झाले आणि संसारासंबंधी माता, पिता बंधु वगैरेनीं हें सगळें जग भरलें आहे, परंतु ते रक्षण करूं शकत नाहींत, आणि शरण देणारे ही होऊं शकत नाहींत; कां कीं ते स्वतः बंधनात

पडलेले आहेत मग दुसऱ्याच्या बंधनास कसें सोडवूं शकतील ?

❀ ❀ ❀

२० दुःखामुळें दुःखित होऊन पाण्याशिवाय माश्याप्रमाणें जीव तडफडत आहे, रोगानें ग्रसित झालेल्या जीवास आप्त, संबंधी आणि संसारातील लोक पाहतात; समवेदना प्रगट करितात; परंतु मुक्त करण्याचें साहस कोणीच करीत नाहीं.

❀ ❀ ❀

२१ हे प्राण्या ! पुत्र, स्त्री, वगैरे सज्जन मनुष्यें माझ्या सुखाचीं साधनें आहेत, असें तूं स्वप्नामध्यें देखील समजूं नकोस; कां कीं संसारांत राहिलेल्या जीवाकरितां तर हीं प्रगाढ बंधनें आहेत.

❀ ❀ ❀

२२ माता दुसऱ्या जन्मांत स्त्री होते आणि स्त्री माता होते ! बाप मरून मुलगा होतो आणि मुलगा मरून बाप होतो. कर्माच्या स्वाधीनतेमुळें सर्व जीवांची

या संसारांत सारखी स्थिति राहूं शकत नाहीं.

❀ ❀ ❀

२३ ज्या ठिकाणीं प्रत्येक जीवांनीं अनंतवेळीं जन्म किंवा मरण केलीं नसतील, अशी कोणतीच जाति नाहीं, योनि नाहीं, कुळ आणिस्थान नाहीं.

❀ ❀ ❀

२४ जेथें जीवानें पुष्कळशा वेळीं नानाप्रकारचीं सुख दुःखें भोगलीं नसतील. अशा ह्या संसारांत किंचित मात्र देखील जागा राहिली नाहीं.

❀ ❀ ❀

२५ ह्या संसारांत ऋद्धि सिद्धि देखील तुला पुष्कळशा वेळीं मिळाल्या आणि स्वजन संबंधी ही मिळाले, परंतु जर तूं आत्मानुभव करण्यास इच्छितोस, तर ह्या अनित्य गोष्टी पासून विश्रांति घे आणि वैराग्य धारण कर.

❀ ❀ ❀

२६ जीव एकट्याच कर्म बंधन करितो आणि

हाच एकटा जिव वध, बंध, आणि मरण वगैरे दुःखांना सहन करितो; तसेंच कर्मामुळें ठकाविला जाऊन, हा जीव एकटाच संसारांत परिभ्रमण करितो.

❀ ❀ ❀

२६ हे प्राण्या ! तुझ्याशिवाय दुसरा कोणीच तुझा शत्रु नाहीं आणि मित्रही नाहीं. हा आत्माच सुखदुःखाचा भोक्ता आहे आणि चांगल्या वाईटाचा कर्ता आहे तर मग तूं दीनमुखी कां बनतोस ?

❀ ❀ ❀

२८ हे प्राण्या ! भयंकर आरंभ ( खटपट ) करून मिळविलेल्या धनास, तुझे आईबाप, भाऊ, स्त्री, पुत्र वगैरे तथा कुटुंब वगैरे स्वजनसमूह भोगितात, परंतु धन मिळवितेवेळीं जें पाप झालें तें तर तुलाच भोगावें लागेल.

❀ ❀ ❀

२९ हे प्राण्या ! मोह प्रेमानें बांधलेला तूं तुझ्या दुःखी आणि भुकेल्या मुलाबाळांची

जितकी चिंता करीत आहेस, त्या अपेक्षेनें हजा-रव्या हिस्सा देखील तूं तुझ्या आत्म्याची चिंता करीत नाहींस, मग तुला काय सांगितले पाहिजे ?

❀ ❀ ❀

३०– हें शरीर क्षणभंगुर अर्थात् क्षणांत नाहींसे होणारें आहे आणि शरीराहून भिन्न आत्मा नित्य आहे, कर्माच्या कारणानें दोघांचा संयोग झाला आहे, मग तूं ह्या शरीरावर इतका मोह कां करितोस ?

❀ ❀ ❀

३१ हे प्राण्या ! आईबाप, भाऊ आणि स्त्री वगैरे कुटुंब कोठून आलें आहे ? आणि कोठें जाईल ? त्याच प्रमाणें तूं कोठून आलास ? आणि कोठें जाशील ? या प्रमाणें एक दुसऱ्याला ओळखीत नाहीं, तर मग हें सर्व कुटुंब तुझें आहे, हें कशावरून ? ( कुटुंब स्वजनाला आपलें करून मानणें खोटें आहे )

❀ ❀ ❀

३२ हें शरीर क्षणभंगुर आहे, ढगांच्या समुदाया प्रमाणें हा मनुष्य जन्म चंचल आहे, याच्या अवधींत जें कांहीं धर्म साधन करून घेतलें, तेंच मनुष्य जन्माचें खरें सार्थक आहे.

❀ ❀ ❀

३३ आश्चर्य आहे कीं; ह्या अनित्य संसारांत लेशमात्र देखील सुख नाहीं, कां कीं जन्म दुःखाचें मूळ आहे वृद्धावस्था रोगाचें मूळ आहे आणि मरण देखील दुःखाची खाणी आहे. तात्पर्य हें आहे कीं संसारच दुःख सागर आहे, त्यामुळें जीवांना दुःख होतें

❀ ❀ ❀

३४ जेथ पर्यंत इंद्रियादि शक्तीचा नाश झाला नाहीं, जरा ( म्हातारपण ) रूपी राक्षसी आली नाहीं, रोगाचे विकार उत्पन्न झाले नाहींत, मरण भेटण्याकरितां आलें नाहीं, तेथ पर्यंतच हे प्राण्या ! यथाशक्ति खूप धर्मसाधन करून घे.

❀ ❀ ❀

३५ हे प्राण्या ! ज्या प्रमाणें प्रचंड अग्नि भडकल्यानंतर कोणी विहीर खणूं शकत नाहींत, तर मग मरण आल्या नंतर जीव कोणत्या प्रकारें धर्माचें आराधन करूं शकेल ?

❀ ❀ ❀

३६ हे प्राण्या ! ह्या शरीराची सुंदरता अशाश्वत आहे, संसारांतील जीवन वीजेच्या सारखें चपल आणि अस्थिर आहे, आणि प्रौढता संध्याकाळच्या रंगाप्रमाणें क्षणिक आणि रमणीय आहे.

❀ ❀ ❀

३७ लक्ष्मी हत्तीच्या काना प्रमाणें चंचल आहे आणि विषयसुख इंद्र धनुष्याच्या रंगाप्रमाणें चंचल आहे, ह्या करितां हे अज्ञानी प्राण्या ! समज, समज, आणि लक्ष्मी एवं विषयसुखाच्या आनंदांत फुलूं नकोस.

❀ ❀ ❀

३८ हे प्राण्या ! ज्या प्रमाणें सायंकाळीं

पक्ष्यांचा संयोग होतो, ज्या प्रमाणें वाटसरू लोकांचा मार्गांत संबंध जुळतो, त्याचप्रमाणें स्वजनांचा संबंध देखील थोड्या वेळेंतच नाश पावणार आहे.

❀ ❀ ❀

३९– हे प्राण्या ! प्रहर रात्र राहते त्यावेळीं उठून असें मनन केलें पाहिजे कीं ; " मी धर्म पराङ्मुख होऊन सारा दिवस व्यर्थ गमावून कां राहिलों आहे ? तसेंच शरीर रूपी घरास आग लागली असतांही मी कशाकरितां झोप घेऊन राहिलों आहे ? आणि शरीर रूपी घर जळाल्यानंतर देखील मी आत्मरक्षा कां करीत नाहीं ? या विषयीं तुला कांहींच चिंता नाहीं.

❀ ❀ ❀

४०– जे दिवस रात्र व्यतीत होतात, ते पुन्हां येत नाहींत, याचप्रमाणें जे जीव रात्रंदिवस अधर्म करितात, त्यांचे ते दिवसरात्र निष्फल जातात.

❀ ❀ ❀

४१ – हे प्राण्या कालाशीं जो मित्रता ठेवीत असेल, किंवा मरणापासून मुक्त होऊन पळून जाण्याचें सामर्थ्य ज्याच्यापाशीं असेल, अथवा मी मरणार नाहीं असा दृढ संकल्प ज्यांनीं केला असेल, त्या मनुष्यांनीं त्या जन्मांत निःसंशय धर्म साधन करूं नये.

* * *

४२ – हे आत्मन ! ज्या प्रमाणें कोष्टी लोक दांड्यानें सूत उचलून ठेवितात, त्याचप्रमाणें रात्र आणि दिवस निघून जातात. आयुष्य कमी होत जातें आणि मग गेलेले दिवस रात्र पुन्हा येत नाहींत.

* * *

४३ – ज्या प्रमाणें सिंह हरिणास उचलून अवश्य मारून टाकितो, त्याचप्रमाणें आयुष्य समाप्त होतांच मरण जीवास ग्रसून टाकितें. त्यावेळीं त्याचे आईबाप किंवा भाऊ वगैरे अंशमात्र देखील रक्षण करण्यास समर्थ होत नाहींत.

* * *

४४– पाण्याच्या बुडबुड्यासारखें आयुष्य आहे, पाण्याच्या थेंबा प्रमाणें वैभव चंचल आहे आणि समुद्राच्या लाटेसारखी लक्ष्मी अस्थिर आहे. तसेंच स्त्री वगैरेचें प्रेम स्वप्नवत् आहे, या करितां जर तूं त्या तत्त्वाच्या गोष्टी जाणतोस, तर अनुकूल काम कर (अर्थात् आलस्याचा परित्याग करून धर्म कार्यांत लाग)

❀ ❀ ❀

४५– सायंकालच्या रंगाप्रमाणें आणि पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें हें आयुष्य आहे, तथा नदीच्या पूरा सारखी ही तरुणावस्था आहे, परंतु हे पातकी प्राण्या ! असें जाणत असतांही तूं कां समजत नाहींस ?

❀ ❀ ❀

४६– ज्या प्रमाणें भूताच्या करितां बलिदान फेंकून देतात, त्याच प्रमाणें मृत्यु देवानें कुटुंबादिकांना निरनिराळ्या गतींत पोहोंचवून दिलें. मुलें

आणि मुली कोठें गेल्या. हें ही माहीत नाहीं आणि स्त्रीचा देखील पत्ता नाहीं, एवं स्वजन देखील अन्य ठिकाणीं निघून गेलेत.

❀ ❀ ❀

४७ निरनिराळ्या जन्मांत जीवानें जे देह धारण केले आणि सोडिले, त्यांची संख्या अनंत समुद्राच्या जलबिंदूंनीं देखील गणिली जाऊं शकत नाहीं.

❀ ❀ ❀

४८ निरनिराळ्या जन्मांत रडत असलेल्या मातांच्या शोकानें निघणाऱ्या नेत्रांतील अश्रूंची संख्या समुद्राच्या जलबिंदुपेक्षां फारच जास्त आहे.

❀ ❀ ❀

४९ नर्कांत गेलेले जीव नर्कगतींत अनंत भयंकर वेदना भोगितात, त्याच्याहीपेक्षां अनंत-गुणा जास्त वेदना जीव निगोदांत भोगितो.

❀ ❀ ❀

५० हे प्राण्या ? अनेक प्रकारच्या कर्मांच्या स्वाधीन होऊन तूं निगोदांत अनंत पुद्गल परिवर्तन काळापर्यंत तीक्ष्ण दुःखास सहन केलेंस.

❀ ❀ ❀

५१ हे प्राण्या ? तूं निगोदांतून फारच मुष्कीलीनें निघून मनुष्य जन्मांत आलास, आणि तदनंतर येथें तुला चिंतामणिरत्नासारखा जिनेश्वराचा धर्म मिळाला आहे.

❀ ❀ ❀

५२ हे प्राण्या ? सत्य धर्म मिळूनही तूं असा आळस कां करितोस ? कीं त्यामुळें तुला संसाररूपी विहिरींत पडून महादुःख सोसण्याची पाळी येईल.

❀ ❀ ❀

५३ हे प्राण्या ! सुदैवानें तुला जैन धर्म मिळाला, परंतु आळस वगैरे अवगुणामुळें त्याचें सेवन केलें नाहींस. याकरितां हे आत्मरिपु प्राण्या !

मग तुला परलोकीं फारच पश्चात्ताप करावा लागेल

❀ ❀ ❀

५४ ज्या प्राण्यांनीं पाप आणि आलस्याच्या वश होऊन जैनधर्माचें पाळण केलें नाहीं, ते बिचारे जीव मरण प्राप्त झाल्यानंतर फारच पश्चात्ताप करितात

❀ ❀ ❀

५५ ज्या संसारांत देवता कालकवलित होऊन ह्मणजे मरून तिर्यंच योनींत ह्मणजे पशुपक्षी वगैरेंच्या योनींत जातात आणि चक्रवर्ती राजे मरून नर्काच्या अग्नींत जळतात. अशा संसारास वारंवार धिक्कार आहे.

❀ ❀ ❀

५६ धन, धान्य, अलंकार, घर, स्वजन आणि कुटुंबाचा परित्याग करून कर्मरूप वायूमुळें नष्ट झालेल्या वृक्षाच्या फुलाप्रमाणें सर्व जीव अनाथ होऊन जातात आणि नर्क वगैरे दुर्गतींत पडतात.

❀ ❀ ❀

५३ ह्या संसारांत परिभ्रमण करीत असतां पर्वतांत, गुंफेंत, समुद्रांत, झाडाच्या अग्र भागीं देखील जीव निवास करून आला आहे, तर मग असें कोणतें तरी ठिकाण आहे काय ? कीं ज्या ठिकाणीं जीवानें अनंत वेळां निवास केला नसेल.

❀ ❀ ❀

५८ हे प्राण्या ! तूं पुष्कळ वेळीं देव, नर्क-गतींतील जीव, कीडा, पतंग, आणि मनुष्याच्या योनींत आलास आणि याच प्रमाणें तूं पुष्कळ वेळीं सुस्वरूप आणि कुरूप, तसेंच सुखी आणि पुष्कळ वेळीं दुःखी देखील झालास.

❀ ❀ ❀

५९ हे प्राण्या ! तूं पुष्कळ वेळीं राजा आणि भिकारी, चांडाळ आणि वैश्य, शूद्र आणि ब्राह्मण झालास. स्वामी, दास, पूज्य, बलवान्, निर्धन आणि धनवान ही झालास.

❀ ❀ ❀

६० याचा कांहीं नियम नाहीं परंतु स्वतः-च्या कर्मांच्या प्रकृती जितक्या गति करीत असतात, तितकेच वेश धारण करून हा प्राणी नटा सारखा परि भ्रमण करीत आहे.

❀ ❀ ❀

६१ हे प्राण्या ! नर्कगतींत अनंत वेळीं अशा नाना प्रकारच्या असह्य एवं दुःख पूर्ण वेदना मिळाल्या, त्या दुःखाची उपमा देखील दिली जाऊं शकत नाहीं.

❀ ❀ ❀

६२ हे प्राण्या ! तूं देवगतींत आणि मनुष्य-गतींत तथा परतंत्रतेच्या साखळींत बद्ध होऊन अनंत वेळीं नानाप्रकारच्या भयंकर वेदना भोगिल्यास.

❀ ❀ ❀

६३ तिर्यंच योनींत ह्मणजे पशु पक्षी वगैरे-च्या योनींत उत्पन्न होऊन अनेक प्रकारच्या भयंकर वेदना सहन करीत असतां हा जीव जन्मजरा

रूपी रहाटांत अनंत वेळीं परिभ्रमण करून आला आहे.

❀ ❀ ❀

६४ शरीर आणि मनापासून जितकीं दुःखें उत्पन्न होतात, तितकीं हा जीव या संसाररूपी अरण्यांत अनंत वेळीं भोगून आला आहे.

❀ ❀ ❀

६५ ह्या असार संसारांत पुष्कळ वेळीं तुला इतकी प्रबल तृषा ( तहान ) उत्पन्न झाली होती कीं, सर्व समुद्रांचें पाणी देखील तुझ्या तृषेची शांतता करूं शकलें नाहीं.

❀ ❀ ❀

६६ हे प्राण्या ! तुला नर्काच्या संसारांत अनेक वेळीं अशी भूक लागली होती कीं, त्या भुकेस मिटविण्याकारितां सर्व घृतादि पुद्गल पदार्थ देखील समर्थ झाले नाहींत.

❀ ❀ ❀

६७ अनेक जन्म मरणा नंतर पुष्कळशा

संकटांचा अनुभव घेतल्या नंतर मनुष्यजन्म मिळतें, तर मग आपल्या इच्छेप्रमाणें जीव आपलें कल्याण सुद्धां करूं शकतो.

❀ ❀ ❀

६८ मनुष्य जन्म फारच कठिणतेनें मिळतें, आणि मनुष्ययोनि वीजेच्या प्रकाशा सारखी चंचल आहे. तरी ही जो मनुष्य धर्मसाधन करण्याकरितां आळस करितो, तो मनुष्य भित्रा आहे, सत्पुरुष नाहीं.

❀ ❀ ❀

६९ ज्याला संसार समुद्राचा अंत करण्याकरितां मनुष्य जन्मरूपी किनारा मिळाला आहे आणि तो जिनेश्वराच्या धर्मास धारण करून त्या प्रमाणें जर चालत नाहीं, तर तो मनुष्य धनुष्याची जीव ( तांत ) तुटल्या नंतर धनुष्यास धारण करणाऱ्या पुरुषाप्रमाणें अवश्य हात घासीत असतां पश्चात्ताप करितो.

❀ ❀ ❀

७० हे प्राण्या ! ऐक. क्षणभंगुर स्वभावाचे सर्व शारीरिक बाह्य पदार्थ आणि नऊ प्रकारचे परिग्रहा ( १ धन २ धान्य ३ मोकळी जमीन ४ बांधलेली जमीन ५ सोनें ६ चांदी ७ तांबे, पितळ ८ दास दासी वगैरे ९ गाई म्हशी वगैरे ) चा परित्याग करून तुला परलोकीं जावें लागणारच आहे. याकरितां शरीर वगैरे पदार्थ संसारांत जे दिसतात, ते सर्व इंद्रजाला सारखे आहेत.

❀ ❀ ❀

७१ हे मूर्खा ! बाप, मुलगा, मित्र, स्त्री वगैरे या लोकीं तुझे संबंधी आहेत, आणि हे सगळे जण स्वतःचें सुख मिळण्याचे उपाय शोधीत आहेत. नर्क आणि तिर्यंचयोनीचें दुःख तूं एकटाच सहन करशील आणि त्यावेळीं कोणीही तुझें रक्षण करणार नाहींत.

❀ ❀ ❀

७२. श्रीमहावीरस्वामी गौतमस्वामीस सांगतात

कीं " हे गौतमा, ज्याप्रमाणें गवताच्या शेंड्यावर ओस बिंदु ह्मणजे दहिंवराचा थेंब फारच थोडावेळ पर्यंत राहूं शकतो, त्याचप्रमाणें हें मनुष्याचें आयुष्य देखील चंचळ आहे. ह्या करितां एक क्षणमात्र देखील आळस करूं नये.

❀ ❀ ❀

७३. श्री महावीर प्रभु सांगतात कीं " हे भव्य जीवांनो समजा! तुह्मी कां समजत नाहींत? मरणानंतर तेंच ज्ञान मिळणें कठीण आहे. रात्र आणि दिवस ज्याप्रमाणें व्यतीत होतात आणि पुन्हां येत नाहींत त्याच प्रमाणें हें मनुष्य जन्म देखील पुनः पुनः मिळत नाहीं."

❀ ❀ ❀

७४. हे मुलांनो! हे वृद्धांनो! कांहीं डोळे उघडून तर पहा. गर्भांत राहिलेले प्राणी सुद्धां मरण पावतात. ज्या प्रमाणें बाज पक्षी ह्मणजे

बहिरससाणा पक्ष्यांना ग्रहण करून मारितो, त्याचप्रमाणें आयुष्य पूर्ण झाल्यानंतर जिंदगीचा (शरीराचा) नाश होतो.

❀ ❀ ❀

७५. जी मनुष्यें तिन्हीं लोकांतील मरत असलेल्या मनुष्यांना (जीवांना) पाहून स्वतःच्या आत्म्यास धर्म कार्यांत प्रवृत्त करीत नाहींत आणि पाप मार्गापासून वेगळे होत नाहींत, त्यांच्या निर्लज्जतेला वारंवार धिक्कार आहे.

❀ ❀ ❀

७६. जे प्राणी विशेष पाप कर्मानें ग्रासिलेले आहेत, त्यांना जास्त उपदेश देऊं नका; कांकीं त्यांना दिलेला हितोपदेश फारच अनर्थकारक आणि द्वेषवर्द्धक होतो.

❀ ❀ ❀

७७. हे प्राण्या! अनंत दुःख देणारें धन, वैभव, स्वजन वगैरे मध्यें तूं ममत्वभाव ठेवितोस,

परंतु अनंत सुखरूप मोक्षाच्या मार्गांत तूं शिथिल दृष्टिगत होतोस.

❀ ❀ ❀

७८. हे प्राण्या ! हा संसार दुःख देणार आहे आणि याचें फळ ही दुःखास देणारें आहे. तरीही अशा दुस्सह दुःखदायक संसारांत राहून स्नेहरूपी बेडीनें जकडलेला प्राणी ह्या संसाराचा परित्याग करीत नाहीं (संसार दुःख दायक आहे असें जाणत असतां ही प्राणी ह्यास सोडित नाहीं.

❀ ❀ ❀

७९.– स्वतः केलेल्या कर्मरूपी वायुकडून चलायमान झालेला जीव, ह्या भयंकर संसार रूप अरण्यांत दुःखानें भोगिल्या जाणाऱ्या कोणकोणत्या विटंबना भोगीत नाहीं? अर्थात सर्व विटंबना भोगितो.

❀ ❀ ❀

८०– हे प्राण्या ! तुझें शरीर तिर्यंच योनींत अरण्यांतील शीतकाळच्या शीतळ वाऱ्याच्या

लहरींनीं पुष्कळ वेळीं जळालें होतें आणि याच-प्रमाणें पुष्कळ वेळीं मरणही आलें होतें.

❀ ❀ ❀

८२– हे प्राण्या ! तिर्यंच योनींत अरण्यांतील ग्रीष्म ऋतूच्या कडक उष्णतेनें तप्त होऊन तूं पुष्कळ वेळीं भूकेचें आणि तहानेचें दुःख सहन केलेंस आणि पुष्कळ पश्चात्ताप केला, याचप्रमाणें पुष्कळ झुरून झुरून मरणाचें दुःख मिळविलेंस.

❀ ❀ ❀

८२– हे प्राण्या ! तूं जनावरांच्या योनिमध्यें अरण्यांत राहून पावसाळ्यांत पर्वतापासून झरणाऱ्या पाण्यानें जळाला होतास आणि त्यानंतर शीतळ वाऱ्यानें दग्ध होऊन तूं पुष्कळ वेळीं मरणाचीं दुःखें भोगिलीस.

❀ ❀ ❀

८३– याप्रमाणें जनावरांच्या योनींत लक्षावधि दुःखें सहन करीत असतां तूं अनंत वेळीं ह्या

भयंकर संसार अरण्यांत परिभ्रमण केलें आहेस.

❀ ❀ ❀

८४– हे प्राण्या ! दुष्ट वस्तु कधीं प्रलय-कालच्या वाऱ्यानें प्रेरित होऊन आणि ह्या भयंकर संसार अरण्यांत परिभ्रमण करून, तूं अनंत वेळीं नर्कामध्यें वर सांगितलेलीं दुःखें भोगिलींस.

❀ ❀ ❀

८५– हे प्राण्या ! तूं वज्राग्निसारख्या उष्णते-पासून आणि अतिशय शीतळतेपासून उत्पन्न होणाऱ्या अनेक वेदनेनीं भरलेल्या सात नर्के भूमींत करुणस्वरानें विलाप करीत असतां पुष्कळ वेळीं राहिला होतास.

❀ ❀ ❀

८६– हे प्राण्या ! ह्या असार मनुष्य जन्मांत पिता, माता स्वजनरहित होऊन किंवा फारच पीडित होऊन तूं पुष्कळ वेळीं रुदन केलेंस, तरीही तूं मनुष्यजन्मास कां सांभाळीत नाहींस. ?

❀ ❀ ❀

८७ हे प्राण्या ? हा आत्मा संसाररूपी अरण्यांत ठिकठिकाणीं धन आणि स्वजनसमूहाचा परित्याग करून आकाश मार्गांतील वाऱ्याप्रमाणें गुप्तरूपानें प्रयाण करितो.

❀ ❀ ❀

८८ चारगति ( १ नर्क २ तिर्यंच ३ मनुष्य ४ देव ) रूप संसारांत जन्म, जरा आणि मरण रूपी भाल्यांनीं विद्ध होऊन, हा जीव भयंकर दुःख भोगीत आहे.

❀ ❀ ❀

८९. तरीही मूर्ख आणि अज्ञानरूपी सर्पानें दंश केलेल्या जीवांना कोणत्याही वेळीं संसार-रूपी कारागृहापासून मुक्त होण्याचा क्षणमात्र देखील विचार येत नाहीं.

❀ ❀ ❀

९० हे प्राण्या ! तूं शरीररूपी विहिरींत किती वेळपर्यंत क्रीडा करशील ? कांकीं शरीर

रूपी विहिरींतून क्षणोक्षणीं काळरूपी रहाट-गाडग्याप्रमाणें आयुष्यरूपी पाणी काढून घेत आहे.

❀ ❀ ❀

९१ हे प्राण्यां ! समज. हे पातकी जीवा ! आळस करूं नकोस. हे अज्ञानी प्राण्या ! परलोकांत दुःखाला पात्र कां बनतोस ?

❀ ❀ ❀

९२ हे प्राण्या ! तूं समज आणि जैनधर्माचें ज्ञान मिळवून संसारापासून विरक्त हो आणि धर्माकडे लक्ष्य दे; कां कीं पुन्हां ही सामग्री मिळणें कठीण आहे.

❀ ❀ ❀

९३ हे प्राण्या ! मिळालेला जिनधर्म पुन्हां दुसऱ्या वेळीं मिळणें कठीण आहे. तूं आलस्यांत निमग्न होऊन राहिलास आणि सुखाची इच्छाही करीत आहेस; परंतु सर्व नर्काचीं दुःखें फारच

दुस्सह आहेत, ह्याकरितां तुझी काय स्थिती होईल, हें मी सांगूं शकत नाहीं.

❀ ❀ ❀

९४ हे प्राण्या ! जर अस्थिर, मलीन, आणि रोग वगैरेच्या स्वाधीन जीवास स्थिर निर्मळ आणि स्वाधीन धर्म मिळतो, तर मग कोणतें मिळविणें बाकी राहिलें ?

❀ ❀ ❀

९५ तुच्छ विभूतियुक्त मनुष्यास चिंतामणि रत्न मिळणें जितकें कठीण आहे, तितकेंच गुणरूपी वैभवरहित मनुष्यास धर्मरत्न मिळणें कठीण आहे.

❀ ❀ ❀

९६– ज्याप्रमाणें आंधळा मनुष्य दृष्टीचा संयोग मिळवूं शकत नाहीं आणि डोळ्यानें पाहूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें मिथ्यात्वरूपी पडदा ज्याच्या डोळ्यावर आला आहे, त्यास जैनधर्माचा

संयोग मिळत नाहीं.

❀ ❀ ❀

९७– संपूर्ण प्रमाणांनीं सिद्ध आणि गुण-सागर जिनेंद्रधर्मामध्यें अपयश वगैरे दूषणांचा लेशमात्र देखील अंश नाहीं ; तरीहि अज्ञानी जीव आंधळे बनून जिनेंद्रांनीं सांगितलेल्या धर्मात केव्हांहि भाग घेत नाहींत.

❀ ❀ ❀

९८– मिथ्यात्वाच्या ठिकाणीं अनंत दोष प्रगट दिसतात आणि त्यांत गुणांचा आभास मात्रही नाहीं. तरीही मोहानें आंधळे बनलेले जीव मिथ्यात्वाचं सेवन करितात, ही फारच आश्चर्याची गोष्ट आहे.

❀ ❀ ❀

९९– जी मनुष्यें सुखकारक आणि सत्यमय धर्मरत्नाची चांगल्या प्रकारें परीक्षा करण्यास

जाणत नाहींत, त्या पुरुषांचें विज्ञान, गुण आणि चातुर्यास धिक्कार आहे ! धिक्कार आहे ! !

❀ ❀ ❀

१००– हा जिनधर्म प्राण्याकरितां अनुपम कल्पवृक्ष आहे, कां कीं हा जैनधर्मरूपी कल्पवृक्ष स्वर्ग आणि मोक्षाचें सुखरूपी फळ देणारा आहे.

❀ ❀ ❀

१०१– हे प्राण्या ! हा जैनधर्म वास्तविक बंधु, मित्र आणि उदार गुरुजी सारखा आहे, त्याचप्रमाणें जैनधर्मांत प्रवृत्त झालेल्या पुरुषां-करितां उत्तम रथ आहे.

❀ ❀ ❀

१०२– हे प्राण्या चर्तुगतीच्या अनंत दुःख-रूप विस्तवानें जळत असलेल्या संसाररूपी भयंकर अरण्यांत अमृताच्या कुंडाप्रमाणें जिनवचनें आहेत. ह्या करितां तूं त्यांचें पान कर आणि मन लाव.

❀ ❀ ❀

१०३– हे प्राण्या ! विषम आणि अनंत दुःख रूपी उष्णतेनें तप्त संसाररूपी मारवाड देशांत मोक्षसुखाला देणारा जैनधर्म कल्पवृक्षासारखा आहे ; मोक्षसुख मिळविण्याकरितां तूं याचा आश्रय घे.

❀ ❀ ❀

१०४– हे प्राण्या ! जास्त सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. जैनधर्मात अशा प्रकारचा पराक्रम तूं दाखविला पाहिजेस कीं, ज्यानें तूं लौकरच संसाररूपी भयंकर समुद्रातून तरून अनंत सुख आणि शाश्वत स्थान (मुक्ति) तुला मिळेल.

❀ ❀ ❀

ॐ शांतिः ! शांतिः !! शांतिः !!!